**शासनाच्या कामकाजावर वृत्तपत्रात प्रसिध्द होणाऱ्या बातम्या/टीकाटिप्पणीवर खुलासा करण्याबाबत कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. पुवप्र २०१०/प्र.क्र.३८१/३४**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक : २९ सप्टेंबर, २०१०**

**संदर्भः** १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.पुवप्र-१२८७/(१७/८७)/३४, दि. १८ फेब्रुवारी,१९८७.

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.पुवप्र-१०९६/७२३/प्र.क्र.१२१/३४, दि.३० एप्रिल,१९९६.

## परिपत्रक

वर्तमानपत्रातून शासन व शासनाच्या विविध खात्यासंबंधात बातम्या व टिकात्मक मजकूर प्रसिध्द होत असतो. अनेकदा हा मजकूर वस्तुस्थितीला धरुन नसतो व अपुऱ्या माहितीवर आधारित असतो. त्यामुळे शासनाच्या भूमिकेबद्दल जनमानसात गैरसमज होण्याची शक्यता असते. ही बाब लक्षात घेता, अशा बातम्यांचा खुलासा तातडीने त्या-त्या विभागाद्वारे त्वरीत करणे आवश्यक आहे.

सध्याच्या पध्दतीनुसार त्या-त्या विभागाशी संबंधित वृत्तपत्रांची कात्रणे महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांच्या कार्यालयामार्फत विभागांना पाठविली जातात व त्या कात्रणावर खुलासा करण्याचे काम संबंधित विभागामार्फत होत असते. मात्र अनेकवेळा अशा प्रकारचा खुलासा तात्काळ केला जात नाही.

तात्काळ खुलासा न केल्यास परिणामकारकता संपून जाते आणि वर्तमानपत्रात अशा खुलाशास फारसे महत्त्व राहत नाही, म्हणून ज्या दिवशी अशा प्रकारची बातमी प्रकाशित केली जाते, त्याच दिवशी त्या बातमीचा खुलासा तातडीने होणे क्रमप्राप्त आहे.

यादृष्टीने मंत्रालयातील सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव / विभाग प्रमुख यांना सूचित करण्यात येते की, नवीन ठरविलेल्या पध्दतीनुसार वर्तमानपत्रामध्ये येणाऱ्या बातम्यांचे संकलन महासंचालक, माहिती व जनसंपर्क या कार्यालयामार्फत केले जाईल व अशा बातम्यांशी कात्रणे व मजकूर संबंधित विभागाकडे त्यांचे कार्यालयामार्फत पाठविले जाईल. संबंधित विभागातील सचिवांनी त्या बातमीवर आपल्या विभागाकडून माहिती घेऊन खुलासा त्याच दिवशी संध्याकाळी ४.०० वाजेपर्यंत महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांच्या कार्यालयास dgipr.mantralaya@gmail.com अथवा dgiprmantralaya@hotmail.com या संकेतस्थळावर पाठवावा. महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांनी अशा प्रकारे प्राप्त झालेल्या खुलाशाचे संकलन करुन संध्याकाळी ६.०० वाजेपर्यंत मा.मुख्यमंत्री सचिवालायातील जनसंपर्क अधिकारी (mahacmpro@gmail.com या ई-मेलवर) यांच्यामार्फत मा.मुख्यमंत्री महोदयांना सादर करणे तसेच वर्तमानपत्रात खुलासा देण्याबाबत पुढील

(कृ.मा.प.)

कार्यवाही करणे आवश्यक राहील. तसेच त्याची प्रत E-mail द्वारे मुख्य सचिव/मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव/प्रधान सचिव, माहिती व जनसंपर्क यांच्याकडे पाठवावी.

जिल्हा/ तालुका पातळीवर प्रकाशित होणाऱ्या बातम्या, ज्यांचा संबंध शासनाच्या धोरणांशी किंवा शासनाच्या पातळीवर घ्यावयाच्या निर्णयाशी निगडीत असेल अशा बातम्या जिल्हा माहिती अधिकारी (DIO) यांनी महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांच्याकडे खुलाशासह पाठवाव्यात व अशा बातम्यांचे संकलन करुन संबंधित सचिवांकडून अभिप्राय घेऊन महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांनी त्याच दिवशी संध्याकाळी मा. मुख्यमंत्र्यांना खुलाशासह मा.मुख्यमंत्री सचिवालयातील जनसंपर्क अधिकारी यांचेमार्फत सादर करावा.

हे आदेश तात्काळ लागू होत असून विभागाकडून खुलासा करण्यास विलंब झाल्यास त्याची गंभीर दखल घेण्यात येईल. सदर परिपत्रक मंत्रालयीन विभागाने त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांच्य निदर्शनास आणून त्यांच्याकडून काटेकोरपणे पालन केले जाईल, याची नोंद घ्यावी.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००९२८१६०८३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( जे. पी. डांगे)**
**मुख्य सचिव**

**प्रति,**

मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
उपमुख्यमंत्री यांचे सचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक
शासनाचे मुख्य सचिव
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई
सर्व विभागीय उपसंचालक,/जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने
निवड नस्ती.